भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील अंशकालीन सफाई कामगारांची पदे दिनांक ०१/०३/२०१७ पासून दिनांक ३०/०९/२०१७ पर्यंत चालु ठेवण्याबाबत

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आपना ०२१७/ प्र.क्र.८१/ पापु १५

७वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॅाफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई - ४०००01
तारीख: ३१ मार्च,२०१७

**<u>वाचा</u>**

१) **शासन निर्णय पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-४५०१/प्र.क्र.१०१/पापु-१५, दिनांक ०४ फेब्रुवारी, २००५
२) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः** पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/ विसु-१, दिनांक २१ सप्टेंबर,२०१६
३) **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांकः** आपना-२०१६/प्र.क्र.५१५/पापु-१५, दिनांक ३१ डिसेंबर,२०१७
४) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः** पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१० फेब्रुवारी,२०१७
५) **सह संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांचे पत्र क्र.** प्रशासन/आस्था-२/प्र.क्र.०१/अंशकालीन/सफाई का/पदे/मुदतवाढ/२०१७-१८/१९५/२०१७ दि.१६ मार्च, २०१७

**<u>प्रस्तावना:-</u>**

संदर्भाधिन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार या विभागाच्या अधिपत्याखालील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील पदांचा आढावा घेऊन सुधारित आकृतिबंध मंजूर करण्यात आला आहे.

संदर्भाधिन क्रमांक २ येथील शासन निर्णयान्वये सर्व प्रशासकीय विभागांना त्यांच्या आकृतिबंधात समाविष्ट असलेल्या अस्थायी पदांना तसेच यापूर्वी आढावा मंजूर केल्यानंतर निर्माण करण्यात आलेल्या परंतु ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तिवात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.२८ फेब्रुवारी,२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याचे अधिकार देण्यात आले होते. त्यानुसार पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या अधिपत्याखालील भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेमधील अंशाकालीन सफाई कामगारांच्या पदांना संदर्भाधिन क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.१०.२०१७ ते दि.२८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

संदर्भाधिन क्रमांक ५ येथील पत्रान्वये अन्वये सहसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी संचालनालयातील २ व ६ उपसंचालक कार्यालयातील प्रत्येकी १ याप्रमाणे ६ अशी एकुण ८

अंशकालीन सफाई कामगारांची पदे आवश्यक असल्याने ती दिनांक ०१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालु ठेवण्याची विनंती शासनास केली आहे. संदर्भ.क्र.४ येथील शासन निर्णयान्वये ज्यांचा समावेश आकृतिबंधात करण्यात आलेला नाही, अशा अस्तिवात असलेल्या सर्व अस्थायी पदांना दि.३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली असून अशी मुदतवाढ देण्याचे अधिकार संबंधित प्रशासकीय विभागांना देण्यात आले आहेत. या बाबींचा विचार करता सदर ८ अंशकालीन सफाई कामागारांच्या पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील कामाची निकड तसेच दिनांक २८/०२/२०१७ पर्यंत या पदांना दिलेली मुदतवाढ विचारात घेऊन भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेतील ८ अंशकालीन सफाई कामगारांच्या पदांना (सोबत जोडलेल्या विवरणपत्र-अ नुसार) दिनांक ०१.०३.२०१७ पासून दिनांक ३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालु ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

या पदांवर होणारा खर्च संबंधित लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ मधील मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या संदर्भाधिन क्रमांक ५ येथील शासन निर्णयान्वये मंत्रालयीन विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३३१११५२१०१२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2017.03.31 15:55:51 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, शिवाजी नगर, पुणे
४. उप सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.

५. उपसंचालक (सर्व), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा.
६. महालेखापाल, महाराष्ट्र -१ व २, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा व लेखाअनुज्ञेयता)
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
८. वरिष्ठ कोषागार अधिकारी, कोकण भवन, नवी मुंबई.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे, नाशिक, औरंगाबाद,अमरावती,नागपूर
१०. निवडनस्ती (कार्या.पापु -१५), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.

शासन निर्णय क्रमांक आपना-०२१७/प्र.क्र.८१/पापु-१५, दिनांक ३१ मार्च,२०१७ सोबतचे विवरणपत्र-अ

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव | मंजूर पदे | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|
| १ | संचालनालय, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | २ | जीडब्ल्यूओ १०७३/८३६०१/ जीएसडीए दि.२४.०९.१९७३ इएसटी १०८३/६६१/३९५४/३७ दि.२१.११.८३ व शुध्दीपत्रक क्रमांक आपना२५८८/३९६/सीआर९६६०/२७ दि.२६.०८.८८ | २७०२ लघुपाटबंधारे ०२ भूजल ००५ अन्वेषण, योजनेत्तर |
| २ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे | १ | जीडब्ल्यु ओ २२७४/३२०/१६ दि.२७.०३.१९९६ | २७०२ लघुपाटबंधारे ०२ भूजल ००५ अन्वेषण, योजनेत्तर |
| ३ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नाशिक | १ | जीडब्ल्यूओ १०८१/४३५/सीआर४१३५ दि.०७.०३.८१ | ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०१) योजनेत्तर |
| ४ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, मुंबई | १ | इएसटी१०८३/३३५२(२८७७)३२ दि.७.०३.९६ | ४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०१) योजनेत्तर |
| ५ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, औरंगाबाद | १ | जीडब्ल्यूओ २२७४/३२०/१६ दि.२७.०३.९६ | २७०२ लघुपाटबंधारे ०२ भूजल ००५ अन्वेषण, योजनेत्तर |
| ६ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, अमरावती | १ | इएसटी१०८३/१४३६ प्र.क्र.१८७/३१ अ दि.०२.०५.८३ | २७०२ लघुपाटबंधारे ०२ भूजल ००५ अन्वेषण, योजनेत्तर |
| ७ | उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर | १ | जीडब्ल्यूओ २२७४/३२०/१६ दि.२७.०३.९६ | २७०२ लघुपाटबंधारे ०२ भूजल ००५ अन्वेषण,योजनेत्तर |